# ग्रिजली अस्वल



सिड हॉफ

मराठी: अश्विनी बर्वे

# ग्रिजली अस्वल



सिड हॉफ

मराठी: अश्विनी बर्वे



दूर उत्तरेत ग्रिजली नावाचा एक अस्वल राहत होता.

ग्रिज़ली एवढा मोठा होता की त्याच्या एक पायाच्या खुणेवर तीन ससे बसू शकत असत.

जेव्हा तो मासे पकडायला जाई तेव्हा नदीचे पाणी त्याच्या गुडघ्यापर्यंत येत असे.



इतर अस्वलांना गुहेत घुसण्यास काहीच त्रास होत नसे.

पण ग्रिज़ली नेहमी गुहेत घुसते वेळी अडकत असे.



म्हणून त्याला उघड्यावरच झोपावे लागे.
पण त्यामुळे त्याला काहीच फरक पडत नसे.
उबदार ठेवण्यासाठी त्याच्या अंगावर एक
जाड फरचे आवरण होते.

इतर प्राण्यांना त्याला उठवण्याची हिंमत होत नसे.

एक दिवस सकाळी जंगलात जोरजोरात आवाज येऊ लागला.

तो आवाज ऐकून बाकीचे अस्वल पळाले.

ग्रिज़ली आवाजाचे कारण बघण्यासाठी गेला.

त्याने काही लोकांना झाडं तोडतांना बघितले.

“लाकडे!“ ते लोक ओरडले.

“तुम्हांला काय पाहिजे?” ग्रिजलीने विचारले.

“तुम्ही माझ्या जंगलात हे काय करत आहात?”



“आम्हांला माफ कर,” त्या माणसांनी म्हटले. “पण आम्ही हे लाकडाचे ओंडके नदीच्या खाली असणाऱ्या आरा मिल मध्ये पाठवायचे आहेत. तिथे त्याच्यापासून कागद तयार होईल.”

ग्रिज़ली म्हणाला, “मी झाडं नसलेल्या जंगलात राहू शकत नाही.”

मग तो राहण्यासाठी एक नवीन जागेच्या शोधात निघाला.

“तुम्हांला माहीत आहे का की चांगले जंगल कुठे आहे?” त्याने विचारले.

"तुला इथे कुठेही जंगल सापडणार नाही,” पहाडी बकरी म्हणाली.

“तुला माहीत आहे का इथे चांगले
जंगल कुठे आहे ते?” त्याने विचारले.

"तुला इथे कुठेही जंगल सापडणार
नाही,” जंगली लांडगा म्हणाला.

"तुला माहीत आहे का इथे चांगले
जंगल कुठे आहे ते?" त्याने विचारले.

“मित्रा, तू हरवला आहेस वाटते!”
वाळवंटातील पालीने विचारले.

ग्रिज़ली फिरत राहिला. मग त्याला अनेक घरे दिसली.

“मी इथे काय करू शकतो?” त्याने विचारले.

“तू आमच्या घरातील अस्वलाच्या कातडीचा गालिचा होऊ शकतो,” काही लोक म्हणाले.

मग लोकांनी त्याला आपल्या घरात घुसू दिले.

ग्रिज़ली फरशीवर झोपला.

आणि लोक त्याच्यावरून जाऊ लागले.

“हे मला आवडत नाही.” ग्रिजली म्हणाला.

मग त्याने घर सोडले.

मग ग्रिजलीला एक खांब दिसला.

“मी त्या झाडावर चढेन.” तो म्हणाला.

“मी इथे आधीपासून आहे,” मांजर म्हणाले.

तिने ग्रिज़लीला पळवून लावले.

कुत्र्या
पासून
सावधान

ग्रिज़लीने एका कुत्रा बघितला. "तू ती सूचना वाचली नाही का?" कुत्र्याने विचारले.

कुत्र्याने पण ग्रिज़लीला पळवून लावले.

ग्रिज़लीने लोकांना नाच करण्यासाठी जातांना बघितले. लोकांनी मुखवटे बघितले होते.

ग्रिज़ली पण नाचण्यासाठी गेला.

“तू एकदम खऱ्याखुऱ्या अस्वलासारखा दिसत आहेस.” लोक म्हणाले.

"धन्यवाद," ग्रिज़ली म्हणाला.

लोक नाचू लागले.

ग्रिज़लीने पण नृत्य केले.

“आता मुखवटे उतरवण्याची वेळ आली आहे,”
कोणीतरी म्हटले.

सगळ्या लोकांनी आपापले मुखवटे काढले.

त्यांनी ग्रिज़लीला सांगितले, “तू पण तुझा मुखवटा उतरव.”

“मी नाही उतरवू शकत,” ग्रिज़ली म्हणाला.

“हाच माझा खरा चेहरा आहे.”

“मग तू इथला नाही” लोक म्हणाले.
“तू प्राणीसंग्रहालयातला आहेस.”

मग ग्रिज़ली प्राणीसंग्रहालयात गेला.

तिथली अस्वले शेंगाची भीक मागत होते.

ग्रिज़लीने पण भीक मागितली.

"कृपया इथून निघून जा," अस्वले म्हणाली.
“आम्हांला जेवढ्या शेंगा मिळतात तेवढ्या हव्या आहेत.
तू सर्कसमध्ये काम मिळवण्याचा प्रयत्न कर.”

सर्कस

अस्वलाची गरज

मग ग्रिज़ली सर्कसमध्ये गेला.

सर्कसवाल्यांनी त्याला रोलर स्केट्स घातले.

पण ग्रिज़ली पडला!

त्यांनी त्याला सायकलवर बसवले.

पण त्याचा अपघात झाला.

सर्कसवाल्यांनी त्याला डोक्यावर
उभे करण्याचा प्रयत्न केला.

पण ग्रिज़ली तेही करू शकला नाही.

ग्रिज़ली म्हणाला, “मला वाटते की यासगळ्यासाठी अभ्यासाची गरज आहे.”

"निश्चितपणे," सर्कशीतले प्रशिक्षित अस्वल म्हणाले.

NO PARKING

नो पार्किंग

ग्रिज़लीने आराम करण्याचा प्रयत्न केला. “तू इथे उभा राहू शकत नाही,” एक पोलीस कर्मचारी म्हणाला.

ग्रिज़लीने म्हटले, “मी आराम करण्यासाठी एखादी जागा शोधून काढेल.”

मग तो तोपर्यंत पळाला जोपर्यंत तो एका दाट जंगलात पोहचत नाही.

ग्रिज़ली म्हणाला, “मी इथे येऊन खूप खुश आहे.”

“आम्हीपण खूप खुश आहोत की तू इथे आला म्हणून,” काही शिकाऱ्यांनी म्हटले.

त्यांनी बंदुकीने त्याचावर नेम धरला.

“गोळी मारू नका!” रेंजर ओरडला.

“हे एक राष्ट्रीय उद्यान आहे.

इथे शिकार करण्याची परवानगी नाही.”

शिकारी निघून गेले.

"धन्यवाद," ग्रिज़ली म्हणाला.



“तू इथे सुरक्षित राहशील,” रेंजरने म्हटले.

“लोक इथे प्राण्यांना गोळी मारू शकत नाही. ते फक्त कॅमेऱ्याने फोटो काढू शकतात.”



सगळ्या लोकांना ग्रिज़लीचा फोटो घ्यायचा होता. कारण तो म्हणजे एक मोठे अस्वल होते.

“आम्हांला एक चांगला फोटो काढू दिल्याबद्दल धन्यवाद.”



“आता हेच माझे जीवन आहे.”

ग्रिज़ली म्हणाला. आता तो खूप खुश होता.

अंत